**लक्ष्यनिर्धारित सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत भारतीय अन्न महामंडळाचे गोदाम ते शासकीय गोदाम या पहिल्या टप्प्याच्या व शासकीय धान्य गोदाम ते शिधा वाटप दुकान या दुस-या टप्प्याच्या त्याचप्रमाणे थेट होणा-या धान्याच्या वाहतूकीदरम्यान वाहतूक तूट वसूलीचे दर निर्धारित करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-३११६/ प्र.क्र. ४० / ना.पु. १६ अ,**
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
**दिनांक : २५ एप्रिल, २०१७.**

**वाचा :** (१) शासन पत्र अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग क्र. संकिर्ण १०९९/ ६०६/ प्र.क्र.२७०८/नापु २९, दि. १९ फेब्रुवारी, १९९९.

**प्रस्तावना :-**

लक्ष्यनिर्धारित सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत भारतीय अन्न मडामंडळाच्या बेस डेपोपासून शासकीय धान्य गोदामापर्यंतच्या वाहतूकीदरम्यान येणा-या वाहतूक तुटीच्या वसूलीसाठी संदर्भाधीन शासन पत्रान्वये सूचना निर्गमित करण्यात आलेल्या होत्या.

दि.०१ फेब्रुवारी, २०१४ पासून राज्यामध्ये राष्ट्रीय अन्न सुरक्षा अधिनियम २०१३ कार्यान्वित करण्यात आलेला आहे. त्यानुसार लाभार्थ्यांना केंद्र शासनाकडून गहू रु.२.०० व तांदूळ रु.३.०० प्रति किलो या अनुदानित दराने उपलब्ध करून देण्यात येत आहे. या अधिनियमामध्ये अंत्योदय व प्राधान्य कुटुंब असे दोनच प्रकारचे लाभार्थी आहेत. विहित उत्पन्न मर्यादेवरील लाभार्थ्यांना (पुर्वीचे APL) धान्याचे वितरण करण्यात येत नाही. त्यामुळे APL साठीचे दर सध्या अस्तित्वात नाहीत. मात्र बहुतांश स्थानिक कार्यालयांकडून संदर्भाधीन सूचनांच्या आधारे वाहतूक तुटीची वसूली विविध दराने करण्यात येते.

दि. २६ नोव्हेंबर, २०१२ रोजीच्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार १७ जिल्ह्यांमध्ये नवीन वाहतूक पद्धती कार्यान्वित करण्यात आलेली आहे. या शासन निर्णयातील परिच्छेद क्र. ३१ मध्ये वाहतुक करताना येणाऱ्या तुटीस वाहतुक कंत्राटदार स्वत: जबाबदार राहील व येणाऱ्या तुटीची रक्कम वाहतुक कंत्राटदारास द्यावयाच्या देयकामधून कपात करण्यात येईल असे स्पष्ट करण्यात आलेले आहे. मात्र वाहतूक तुटीची वसूली कोणत्या दराने करावी, हे स्पष्ट करण्यात आलेले नाही. त्याचप्रमाणे नवीन वाहतूक पद्धतीनुसार शासकीय गोदाम ते शिधा वाटप दुकान या वाहतुकीमध्ये तसेच शिधा वाटप दुकानांपर्यंत होत असलेल्या थेट वाहतूकीमध्ये येणारी वाहतूक तूटही विचारात घेण्याची गरज आहे.

उपरोक्त बाबी विचारात घेऊन वाहतूक तूट वसूलीच्या दरात सुसुत्रता आणण्याच्या दृष्टीकोनातून सुस्पष्ट सूचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

लक्ष्यनिर्धारित सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत अन्नधान्याच्या भारतीय अन्न महामंडळाच्या बेस डेपोपासून शासकीय धान्य गोदामापर्यंतच्या पहिल्या टप्प्याच्या, शासकीय गोदामापासून शिधा वाटप दुकानांपर्यंतच्या दुस-या टप्प्याच्या तसेच भारतीय अन्न महामंडाळाच्या बेस डेपोपासून शिधा वाटप दुकानांपर्यंत होत असलेल्या थेट वाहतूकीदरम्यान येणारी वाहतूट तूट वसूल करण्यासंदर्भात पुढीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी :

१. प्रती टन(१००० किलो) साठी ०.५ कि.ग्रॅ. (५०० ग्रॅम) इतकी वाहतूक तूट क्षमापित करण्यात यावी.

त्यावरील तूटीची वसूली स्थानिक घाऊक बाजारभावाने करण्यात यावी.

२. वाहतूक तुटीचे उपरोक्त दर हे सदर शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०१७०४२५१२४६३९५६०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Satish Shridhar Supe

Digitally signed by Satish Shridhar Supe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supplies And Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f7773ccec10687b16ba0f2d3f7f9e6f87fe68f9b1b2cb5b73b75bab952ca0621, cn=Satish Shridhar Supe
Date: 2017.04.25 12:47:34 +05'30'

**(सतिश श्रीधर सुपे)**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.मंत्री, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
२) मा.राज्य मंत्री, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
३) सर्व विभागीय आयुक्त,
४) नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई.
५) सर्व जिल्हाधिकारी (मुंबई व मुंबई उपनगर जिल्हा वगळून)
६) संचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई सर्व उपायुक्त (पुरवठा),
७) वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
८) उप आयुक्त (पुरवठा),विभागीय आयुक्त, कार्यालय (सर्व)
९) सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी
१०) उपसंचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्तांचे कार्यालय, मुंबई.
११) निवड नस्ती/नापु-१६अ.

------